**भिवापूर लघु प्रकल्पाच्या सांडव्याची दुरूस्ती, ता.तिवसा, जि.अमरावती चे विशेष दुरुस्ती अंदाजपत्रकास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.२३४/२०२०)/ सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ५ मे २०२२

वाचा:-

१. कार्यकारी संचालक, विर्दभ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र.जा.क्र.५३४/ विपाविम / कातां-४/ भिवापूर / २०२२ दि. २०/०१/२०२२.
२. शासन निर्णय - २०१७/(५६६/१७)/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/(५५१/१७)/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र. प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे) दि १/१/२०१५.

प्रस्तावना:-

भिवापूर लघु प्रकल्प हा अमरावती जिल्हयातील तिवसा तालुक्यात स्थित असुन अमरावती- कुरहा रस्त्यावर असुन अमरावती पासुन २५ कि.मी. अंतरावर आहे. प्रकल्पाचे एकुण सिंचन क्षेत्र ६४५ हे. इतके आहे. सदर प्रकल्पाचा सांडवा (channel type) हा अतिवृष्टी व सांडव्यावरून वाहुन जाणा-या पुराच्या पाण्यामुळे खालील बाजुस खुपच पोखरल्या गेलेला आहे. तसेच सदर बांधकामाची झीज व तुटफूट झालेली आहे. सद्यस्थितीत पोखरलेला भाग हा Waste weir Bar पर्यंत येऊन पोहचलेला आहे. सांडवा हा आता अंत्यत धोकादायक स्थितीत असुन धरण सुरक्षितता संघटना, नाशिक यांनी धरण सुरक्षिततेच्या अनुषंगाने Dam Health Status Report - २०१३ मध्ये सांडव्याची तातडीने दुरूस्ती करण्याविषयी सुचविले होते. तदनंतर अधीक्षक अभियंता धरण सुरक्षितता संघटना , नाशिक यांनी दि. २६/०६/२०२० रोजी धरणाची प्रत्यक्ष पाहणी करून सांडव्याची दुरूस्ती तातडीने करून घेणेबाबत निर्देश दिले आहेत.

सदर काम हे जलसंपदा विभाग शासन निर्णय क्र २०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे), दि.१/८/२०१९ नुसार कार्यप्रकार-१ मधील प्राधान्यक्रम -२ नुसार प्रस्तावित असुन , त्याअनुषंगाने भिवापूर लघु प्रकल्पाच्या सांडव्याची दुरूस्ती, ता.तिवसा, जि.अमरावती चे विशेष दुरुस्ती अंदाजपत्रकास अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर अंतर्गत ता. तिवसा , जि. अमरावती येथील भिवापूर लघु प्रकल्पाच्या सांडव्याच्या विशेष दुरुस्ती अंदाजपत्रकाच्या रू. ४,३६,२४,४४४ /- (रू. चार कोटी छत्तीस लक्ष चोवीस हजार चारशे चौवेचाळीस फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१)तांत्रिक मान्यता ,निविदा प्रक्रिया, कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय /परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन,निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लहान पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०- सर्वसाधारण,१९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती/विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अनुदान (००)(१९) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र)(कार्यक्रम) (४७०२ ७४९९) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ५ सन २०२२ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०५१६०१३२८९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.05.05 16:04:23 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**सोबत :- सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
१४) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग ,अमरावती
१५) आंतर वित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा सिंचन मंडळ ,अमरावती,
१७) कार्यकारी अभियंता, मध्यम व लघु पाटबंधारे विभाग ,अचलपूर
१८) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२२/ (प्र.क्र.१०७/२०२२)/ सिंव्य (कामे),

दि. ०५ /०५/ २०२२ चे सहपत्र

| Sr.No. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| १ | C – Works (excluding Royalty) | ३३४०५०८२ |
| २ | Royalty | ४८७४५४९ |
| ३ | १ % Insurance | ३३४०५१ |
| ४ | १२ % GST | ४००८६१० |
| ५ | ३ % Contingencies | १००२१५२ |
| | **Total Rs.** | **४३६२४४४४** |

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.05.05 16:04:49 +05'30'

( वैजनाथ चिल्ले )
शासनाचे उप सचिव